सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता "सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम" (४४०६ ०४९२) या योजनेंतर्गत अभिसरणांतर्गत करावयाच्या पूर्व पावसाळी कामांसाठी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- साववि-२०२४/प्र.क्र.२०/फ-११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांकः- १ जुलै, २०२४

वाचा-:

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक-सावि-२०२२/प्र.क्र.५८/फ-११, दिनांक २८.०७.२०२३

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४

३) महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक -सावि-२०२४/प्र.क्र.१०(भाग-१)/फ-११, दिनांक ०४.०३.२०२४

४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक १८.०४.२०२४, दिनांक ०३.०५.२०२४, दिनांक १०.०५.२०२४ व दिनांक २८.०५.२०२४

५)प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) म.रा.नागपूर, याचे क्रमांक कक्ष-१/पी/यो /नबाप्र/प्र.क्र. ०२/१८६/२०२४-२५, दिनांक १०.०६.२०२४.

६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) म.रा.नागपूर, याचे क्रमांक कक्ष-१/पी/यो नबाप्र/प्र.क्र.०२/२०१/२०२४-२५, दिनांक ११.०६.२०२४.

७) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) म.रा.नागपूर, याचे क्रमांक कक्ष-१/पी/यो नबाप्र/प्र.क्र.०२/२४४/२०२४-२५, दिनांक २४.०६.२०२४

८) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) म.रा.नागपूर, याचे क्रमांक कक्ष-१/पी/यो नबाप्र/प्र.क्र.०२/२५७/२०२४-२५, दिनांक २५.०६.२०२४

९) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक सावि-२०२४/प्र.क्र.३५/फ-११ दिनांक २७.०६.२०२४.

प्रस्तावना-:

वन आणि वनेतर क्षेत्रात वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता सन २०२४-२५ करीता "सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)" या राज्य योजनेंतर्गत रु.६०५६०.०० लक्ष इतका निधी (०२-मजूरी अंतर्गत रु.३७६८९.६० लक्ष, १३-कार्यालयीन खर्च अंतर्गत रु.०.०१ लक्ष, २१-पुरवठा व सामग्री अंतर्गत रु.२०८३९.३८ लक्ष, २४- पेट्रोल, तेल व वंगण अंतर्गत रु.०.०१ लक्ष आणि ५०-इतर खर्च अंतर्गत रु.२०३१.०० लक्ष, ) अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

०२. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक २ येथे नमूद दिनांक ०१.०४.२०२४ रोजीच्या परिपत्रकान्वये वित्तीय वर्ष सन २०२४-२५ करिता एप्रिल ते जुलै, २०२४ पर्यंतची मासिक विवरणपत्रे, अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर विभागास आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमावरील खर्चाचा निधी (लेखानुदान) वितरीत करण्याबाबत सुचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. तसेच निधी वितरीत करतांना मासिक निधी विवरणपत्रात (Cash Flow Statement) ज्या दरमहा खर्च रकमा दर्शविल्या आहेत त्याच्याशी सुसंगत असाव्यात असे सुचित करण्यात आले आहे.

०३. संदर्भाधीन क्रमांक १ येथे नमूद दिनांक २८.०७.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये वनीकरण तसेच वन क्षेत्रातील मृद व जलसंधारणाची सर्व कामे ही महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना व वन विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या योजनांचे अभिसरण करून घेण्यास व उर्वरित फरकाची रक्कम योजनेंतर्गत उपलब्ध तरतुदीमधून अदा करण्यास मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार "सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)" या राज्य योजनेंतर्गत करण्यात येणारी कामे सुध्दा अभिसरणांतर्गत करणे आवश्यक आहे. त्यानुसार संदर्भाधीन क्रमांक ४ व ९ येथील दिनांक १८.०४.२०२४, दिनांक ०३.०५.२०२४,दिनांक १०.०५.२०२४, दिनांक २८.०५.२०२४ व दिनांक २७.०६.२०२४ अन्वये अनुक्रमे रु.१८६७.०५ लक्ष , रु.११९८.२९लक्ष, रु.१६७१.८० लक्ष, रु. ३२६.२८ लक्ष व ९३३३.२४ लक्ष असा एकूण रु. **१४९९६.६६** लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

०४. संदर्भाधीन क्रमांक ५, ६ व ७ येथे नमूद दिनांक दि.१०.०६.२०२४ दि.११.०६.२०२४ व दि. २५.०६.२०२४ रोजीच्या पत्रान्वये "सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम" (४४०६ ०४९२) या योजनेंतर्गत सन २०२४-२५ या वर्षाकरीता "वनिकरणाचा भरगच्च कार्यक्रम" अंतर्गत अभिसरणांतर्गत पूर्व पावसाळी कामांकरीता नवीन चालू बाब प्रस्ताव शासनास सादर करण्यात आले आहेत. त्यानुसार अनुक्रमे १५० हे.आर.,१० हे.आर. व ६२३ हे.आर असे एकूण **७८३ हे.आर.** क्षेत्रावर अभिसरणांतर्गत करावयाच्या पूर्व पावसाळी कामांकरीता योजनांतर्गत निधीमधून अनुक्रमे रु.३६.२४ लक्ष , रु.८.१० लक्ष, रु ३२४.१७ लक्ष असे एकूण रु. **३६८.५१** लक्ष इतका निधी वितरीत करण्याबाबत विनंती केली आहे.

०५. दिनांक २४.०६.२०२४ च्या पत्रान्वये "सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम" (४४०६ ०४९२) या योजनेंतर्गत सन २०२४-२५ या वर्षाकरीता "महत्त्वाचे रस्ते/ रेल्वे/ कालवे/ दुतर्फा वृक्ष लागवड" व "गट लागवड योजना" अंतर्गत अभिसरणाद्वारे (Top up model) करावयाच्या पूर्व पावसाळी कामांसाठी नवीन बाब प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला आहे. त्यानुसार महत्त्वाचे रस्ते/ रेल्वे/ कालवे/ दुतर्फा वृक्ष लागवड अंतर्गत ३२ हे.आर. क्षेत्रावर अभिसरणांतर्गत करावयाच्या पूर्व पावसाळी कामांकरीता योजनांतर्गत निधीमधून ६.९१ लक्ष इतका निधी वितरीत करण्याबाबत विनंती केली आहे. याबरोबरच गट लागवड योजनेंतर्गत १६ हे.आर. क्षेत्रावर अभिसरणांतर्गत करावयाच्या पूर्व पावसाळी कामांकरीता योजनांतर्गत निधीमधून रु. ४.५८ लक्ष इतका निधी वितरीत करण्याबाबत विनंती केली आहे. त्यानुसार "सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)" या योजनेंतर्गत "वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम","महत्त्वाचे रस्ते/ रेल्वे/ कालवे/ दुतर्फा वृक्ष लागवड"

आणि “गट लागवड योजना” या योजनेंतर्गत अभिसरणाव्दारे करावयाच्या पूर्व पावसाळी कामांकरीता योजनांतर्गत तरतुदीमधून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः-</u>**

सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात (००)(०६) “सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)" या योजनेंतर्गत “वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम” अंतर्गत अभिसरणाव्दारे करण्यात येत असलेल्या पूर्व पावसाळी कामांकरीता मंजूर अंदाजपत्रकानुसार योजनांतर्गत तरतुदीमधून खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार वन वृत्त/विभाग निहाय निधी वितरित व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| वनिकरणाचा भरगच्च कार्यक्रम अंतर्गत कामाचा तपशील | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | वनवृत्त | वनविभाग | कामाची बाब | हेक्टर आर. | पूर्व पावसाळी कामांकरीता अंदाजपत्रकानुसार योजनांतर्गत आवश्यक निधी (रू.लाखात) | | |
| | | | | | ०२-मजुरी | २१-साहित्य पुरवठा | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | **नागपूर** | नागपूर | **पूर्व पावसाळी कामे** | १५ | ८.३२ | ३.५७ | ११.८९ |
| | | भंडारा | | ३९६ | ५४.७९ | २३.४८ | ७८.२७ |
| **एकूण नागपूर** | | | | **४११** | **६३.११** | **२७.०५** | **९०.१६** |
| २ | **ठाणे** | डहाणु | | ५ | १.७१ | ०.७४ | २.४५ |
| | | जव्हार | | १४० | २१ | ९ | ३० |
| **एकूण ठाणे** | | | | **१४५** | **२२.७२** | **९.७३** | **३२.४५** |
| ३ | **नाशिक** | पुर्व नाशिक | **पूर्व पावसाळी कामे** | ६२ | ४६.४१ | १९.८९ | ६६.३० |
| | | पश्चिम नाशिक | | ९५ | ८३.५९ | ३५.८२ | ११९.४१ |
| | | अहमदनगर | | ७० | ४२.१३ | १८.०६ | ६०.१९ |
| **एकूण नाशिक** | | | | **२२७** | **१७२.१३** | **७३.७७** | **२४५.९०** |
| **एकूण एकंदर** | | | | **७८३** | **२५७.९६** | **११०.५५** | **३६८.५१** |

| रस्ते/ रेल्वे/ कालवे/ दुतर्फा वृक्ष लागवड कामांचा तपशील | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | वनवृत्त | वनविभाग | कामाची बाब | हेक्टर आर. | पूर्व पावसाळी कामांकरीता अंदाजपत्रकानुसार योजनांतर्गत आवश्यक निधी (रू.लाखात) | | |
| | | | | | ०२-मजुरी | २१-साहित्य पुरवठा | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | नागपूर | नागपूर | **पूर्व पावसाळी कामे** | ३२ | ४.८४ | २.०७ | ६.९१ |
| | **एकंदर नागपूर** | | | **३२** | **४.८४** | **२.०७** | **६.९१** |

| गट लागवड कामांचा तपशील (अभिसरण) | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | वनवृत्त | वनविभाग | कामाची बाब | हेक्टर आर. | पूर्व पावसाळी कामांकरीता अंदाजपत्रकानुसार योजनांतर्गत आवश्यक निधी (रू.लाखात) | | |
| | | | | | ०२-मजुरी | २१-साहित्य पुरवठा | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | **पुणे** | सातारा | **पूर्व पावसाळी कामे** | ८ | १.६४ | ०.७० | २.३४ |
| | | सांगली | | ८ | १.५७ | ०.६७ | २.२४ |
| | **एकूण पुणे** | | | **१६** | **३.२१** | **१.३७** | **४.५८** |

२. उपरोक्त तक्त्यात नमूद केल्यानुसार "सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)" या योजनेंतर्गत ०२-मजुरी आणि २१-साहित्य पुरवठा या उद्दिष्टांकरीता योजनेंतर्गत "वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम" अंतर्गत अभिसरणाव्दारे करण्यात येत असलेल्या पूर्व पावसाळी कामांकरीता मंजूर अंदाजपत्रकानुसार योजनांतर्गत तरतुदीमधून एकूण रु. **३८० लक्ष** इतका निधी वितरीत करण्यात येत आहे. सदर निधी हा संबंधित योजनांतर्गत अभिसरणाव्दारे करण्यात येत असलेल्या पूर्व पावसाळी कामांकरीताच खर्च करण्यात यावा. तसेच सदर अभिसरणांतर्गत पूर्व पावसाळी कामांना निधी वितरीत करतांना वन वृत्त/विभाग निहाय कामांचा तपशिल तपासूनच सदर

निधी वितरीत करण्याची कार्यवाही अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या कार्यालयाकडून करण्यात यावी.

३. सदर निधी नियंत्रक अधिकारी म्हणून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्त करण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारी यांनी सदर निधी तात्काळ वितरीत करून त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा. या योजनेंतर्गत करण्यात आलेल्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्यात आली आहे याबाबतची दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घेण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) हे वर्ष २०२४-२५ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील. सदर निधी वितरीत करतांना करण्यात येत असलेली कामे ही संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक २८.०७.२०२३ मधील तरतुदी, संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन परिपत्रकातील सुचना, शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सुचना तसेच सक्षम प्राधिकारी यांनी मान्यता दिलेल्या अंदाजपत्रकानुसार तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आल्याची खातरजमा करून निधी वितरणाची कार्यवाही नियंत्रक अधिकारी यांनी करावी. तसेच सदर निधी खर्च करतांना सुध्दा शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सुचनांचे पालन करण्याबाबतच्या सुचना अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या कार्यालयाकडून संबंधीतांना देण्यात याव्यात.

५. सदर निधी वितरित करण्यापूर्वी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२४-२५ करीता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी.

६. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक २ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

७. वन वृत्त/विभाग निहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

८. सदर योजनेंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.सी-१०,**

**४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च,**

**(००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपन (४४०६ ०४९२)**

**०२- मजूरी २१- साहित्य पुरवठा**

९. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे दिनांक ०१.०४.२०२४ रोजीचे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक-विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७०११४४५२५७११९ क्रमांक असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INGALE VINAYAK BALASAHEB

Digitally signed by INGALE VINAYAK BALASAHEB
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=4282a00b0a0507f339edd9409eebc43f466c57e6ec219f022cb4d8e9d79999ec, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B9DD74802C0E9E87CDD582D1AEA8DC4506C60DEA869DFE0B71557BF4A56623D7, cn=INGALE VINAYAK BALASAHEB
Date: 2024.07.01 14:56:59 +05'30'

**( वि.बा. इंगळे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक ) (११ वृत्त )
५. वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण ( ६ वृत्त )
६. विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण ( सर्व जिल्हे )
७. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
१०. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
११. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. निवडनस्ती फ-११.